**औद्योगिक प्रशिक्षण संस्था, धारावी, मुंबईसाठी शिक्षकीय व शिक्षकेत्तर २० पदांना मंजूरी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयटीआय २०१३/प्र.क्र. ७६/व्यशि-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १९ मे, २०१७.

<u>वाचा</u>: १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१०/१७०/ प्र.क्र. ४८/ व्यशि-३, दिनांक १८.०९.२०१२.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. आयटीआय-२०१०/१७०/ प्र.क्र. ४८/व्यशि-३, दिनांक ०५.१२.२०१२
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१३/ प्र.क्र. ६१/ व्यशि-३, दिनांक १२.०६.२०१३.
४) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. २०/सीटीएस/औप्रसंधारावी/२०१३/१५०, दिनांक २१.०३.२०१३.
५) उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. २०/सीटीएस/धारावी/२०१६/८४, दिनांक ०६.०४.२०१६.
६) वित्त विभाग क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.५३/१६/आ.पु.क., दिनांक २५.०२.२०१७ व त्यासोबतचे उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २३.०२.२०१७ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.

**<u>प्रस्तावना</u> :-** धारावी ही आशिया खंडातील सर्वात मोठी झोपडपट्टी असून त्याची लोकसंख्येची घनता अधिक आहे. तेथे अनेक लघु मध्यम उद्योग, घरगुती स्तरावर चालणारे हस्त व्यवसाय सुरू आहे. यास्तव या भागात कुशल मनुष्यबळाला मोठया प्रमाणात मागणी आहे. तथापि, स्थानिक भागात व्यवसाय प्रशिक्षणाच्या सुविधा उपलब्ध नसल्यामुळे कुशल मनुष्यबळ मागणीच्या प्रमाणात उपलब्ध होत नाहीत. धारावी येथे नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करण्याबाबत स्थानिक नागरीक व लोकप्रतिनिधींनी वारंवार मागणी केलेली आहे. त्याअनुषंगाने धारावी मुंबई येथे औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करण्यासाठी स्थानिक उद्योगधंद्यांच्या गरजा लक्षात घेवून, रोजगार व स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध असलेले शिल्पकारागीर प्रशिक्षण योजनेतील ०४ व्यवसाय अभ्यासक्रम व सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत कन्स्ट्रक्शन ॲण्ड वुड वर्कीग सेक्टरमधील रॉड बेस बेसीस मॉडयुल व ॲडव्हान्स मॉडयुल सुरू करण्यास संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये तत्वत: मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर संदर्भीय (२) येथील शासन शुध्दीपत्रकान्वये तत्वत: मान्यता ऐवजी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच राष्ट्रीय व्यवसाय शिक्षण परिषदेची (NCVT), नवी दिल्ली यांची कायमची संलग्नता मिळेपर्यंत औद्योगिक प्रशिक्षण संस्था, धारावी, मुंबई येथे विजतंत्री, नळकारागीर, संधाता, यांत्रिक डिझेल हे व्यवसाय अभ्यासक्रम राज्य व्यवसाय शिक्षण परिषदेअंतर्गत (SCVT) सुरू करण्यास संदर्भीय (३) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. धारावी येथे औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यासाठी आवश्यक शिक्षक व शिक्षकेतर पदांच्या निर्मितीच्या प्रस्तावास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्यात येईल, असे संदर्भीय (१) येथील शासन निर्णयामध्ये स्पष्ट करण्यात आले आहे. त्यास अनुलक्षून सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी संदर्भीय (४) येथील पत्रान्वये १३ शिक्षकीय व ११ शिक्षकेतर

अशा एकूण २४ पदांना मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. यासंदर्भात उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक २३.०२.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत १३ शिक्षकीय व ७ शिक्षकेतर अशा एकूण २० पदांना मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार पदनिर्मितीचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :** औद्योगिक प्रशिक्षण संस्था, धारावी, मुंबई येथे संदर्भीय (३) येथील शासन निर्णयान्वये शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनेतील ५ व्यवसाय अभ्यासक्रमासाठी सोबत जोडलेल्या **"सहपत्र अ"** मध्ये दर्शविल्यानुसार शिक्षकीय संवर्गतील १३ व शिक्षकेत्तर संवर्गातील ०७ अशा एकूण २० पदांच्या निर्मितीस मान्यता देण्यात येत आहे.

सदर पदांवरील खर्च "मागणी क्रमांक झेडए-१, मुख्य लेखाशीर्ष- २२३०- कामगार व सेवायोजन, ०३- प्रशिक्षण, ००३ कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण, (०२) (०८) प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (२२३० ए २०९)" या लेखाशिर्षाखालील तरतूदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६३/१४७१, दिनांक ०७.०२.२०१४ तसेच वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ११२ /आ.पु.क., दिनांक १५.०५.२०१७ व अनौपचारिक संदर्भ क्र. ७१/व्यय-६, दिनांक १८.०५.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१९१७२६३२८८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vivek Madhav Patil

Digitally signed by Vivek Madhav Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=841bf2ba2d65f151b54b8b93f504695966d17aeec76b11455a90a9edb7b50ff1, cn=Vivek Madhav Patil
Date: 2017.05.19 17:51:37 +05'30'

**( विवेक मा. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई.
७. मा. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव (व्यशि), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा, मुंबई-५१.
१०. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, मुंबई
११. कक्ष अधिकारी (व्यय-५)/(आ.पु.क.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यशि-१/व्यशि-२/व्यशि-५/रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.

कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१३/ प्र.क्र. ७६/ व्यशि-३, दिनांक १९ मे, २०१७. चे **"सहपत्र अ"**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| | **शिक्षकीय पदे** | | |
| १ | प्राचार्य (गट ब) | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४८०० | १ |
| २ | गट निदेशक | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४०० | १ |
| ३ | शिल्प निदेशक वीजतंत्री | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४३०० | २ |
| ४ | शिल्प निदेशक नळ कारागिर | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४३०० | २ |
| ५ | शिल्प निदेशक संधाता | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४३०० | २ |
| ६ | शिल्प निदेशक यांत्रिक डिझेल | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४३०० | २ |
| ७ | शिल्प निदेशक जोडारी | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४३०० | २ |
| ८ | गणित तथा चित्रकला निदेशक | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४३०० | १ |
| | | **एकूण शिक्षकीय पदे** | **१३** |
| | **शिक्षकेतर पदे** | | |
| १ | वरिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० ग्रेड वेतन २४०० | १ |
| २ | सहायक भांडारपाल | ५२००-२०२०० ग्रेड वेतन १९०० | १ |
| ३ | कनिष्ठ लिपिक तथा टंकलेखक | ५२००-२०२०० ग्रेड वेतन १९०० | १ |
| ४ | शिपाई | ४४४०-७४४० ग्रेड वेतन १३०० | १ |
| ५ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | ४४४०-७४४० ग्रेड वेतन १३०० | ३ |
| | | **एकूण शिक्षकेतर पदे** | **७** |
| | | **एकूण - शिक्षकीय व शिक्षकेतर पदे** | **२०** |

Vivek Madhav Patil

Digitally signed by Vivek Madhav Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=841bf2ba2d65f151b54b8b93f504695966d17aeec76b11455a90a9edb7b50ff1, cn=Vivek Madhav Patil
Date: 2017.05.19 17:51:53 +05'30'

**( विवेक मा. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**